**एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम**

वित्तिय वर्ष २०१८-१९ करीता वनामती, नागपूर या प्रशिक्षण संस्थेस माहे ऑगस्ट, २०१८ ते माहे डिसेंबर, २०१८ या कालावधीकरीता झालेल्या / होणा-या खर्चासाठी ३६-सहायक अनुदाने (वेतन) या बाबीखाली वाढीव अनुदान वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : टिआरएन-०४१८/प्र.क्र.२६/सीपीटीपी-ब**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक : ७ सप्टेंबर, २०१८.

**वाचा** : १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.टिआरएन-२०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ/१८-ब, दिनांक ०८ ऑगस्ट, २०१४

२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२.०४.२०१८.

३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. बीयुडी-२०१८/प्र.क्र.७०/२०१८/२५, दिनांक ०४.०४.२०१८.

४) सामान्य प्रशासन विभाग, आदेश क्र.टिआरएन-१०१७/प्र.क्र.१२३/सीपीटीपी-ब, दिनांक ०६.११.२०१७

५) संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर यांचे पत्र क्र.वनामती/सीपीटीपी-४/वेतन/कॅशफ्लो/लेखा-४/१२९६, दिनांक १९.०४.२०१८.

६) शासन निर्णय समक्रमांक दिनांक ०४.०५.२०१८

७) शासन शुध्दीपत्र समक्रमांक दिनांक ०४.०५.२०१८

८) शासन शुध्दीपत्र समक्रमांक दिनांक ०५.०५.२०१८

९) शासन शुध्दीपत्र समक्रमांक दिनांक १५.०५.२०१८

१०) संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर यांचे पत्र क्र.वनामती/सीपीटीपी-४/वेतन/कॅशफ्लो/लेखा-४/२६७२, दिनांक २९.०८.२०१८.

**शासन निर्णय** :-

उपरोक्त वाचा येथील अनुक्रमांक १ येथील शासन निर्णयानुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या राज्य सेवा परीक्षेतून निवड झालेल्या गट अ व गट ब मधील उमेदवारांसाठी यशदा, पुणे व वनामती , नागपूर या प्रशिक्षण संस्थांमार्फत एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यात येतो.

२. एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम ५ अंतर्गत प्रशिक्षण घेणाऱ्या २९९ प्रशिक्षणार्थीसाठी वसंतराव नाईक कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर यां संस्थेला सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी रुपये ८,६८,०१,०००/- (रुपये आठ कोटी अडुसष्ठ लाख एक हजार फक्त ) इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आलेली आहे.

३. उपरोक्त वाचा येथील अनुक्रमांक ३ येथील परिपत्रकानुसार सन २०१८-१९ या आर्थिक वर्षामधील निधी वितरणास वित्त विभागाने अनिवार्य व कार्यक्रमांवरील खर्च याबाबतचा अर्थसंकल्पित निधी एकूण वार्षिक तरतुदीच्या ७० टक्के मर्यादेत वितरीत करण्याबाबत निर्देश दिलेले आहेत, त्यानुसार सन २०१८-२०१९ या आर्थिक वर्षात लेखाशीर्ष-ए-४, २०७० इतर प्रशासकीय सेवा ००-००३ प्रशिक्षण (००)(११) वनामती, नागपूर (२०७००८६२) खाली उपलब्ध असलेल्या रु.८,६८,०१,०००/- इतक्या तरतूदीमधून वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर या संस्थेला उपरोक्त वाचा येथील अनुक्रमांक ६ अन्वये उपलब्ध तरतुदीच्या ७० टक्केच्या

मर्यादेत रु.५,७४,३५,००० इतका निधी माहे एप्रिल २०१८ ते डिसेंबर २०१८ या कालावधीकरीता ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर ) या बाबीखाली रु.५,७०,००,०००/- व ३६-सहायक अनुदाने (वेतन) या बाबीखाली रु.४,३५,०००/- वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात आली होती.

४. आता संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर यांनी उपरोक्त वाचा येथील अनुक्रमांक १० नुसार माहे ऑगस्ट २०१८ मध्ये दोन सहायक रुजू झाल्यामुळे मासिक वेतनावरील खर्चात वाढ झाल्यामुळे ३६-सहायक अनुदान (वेतन) या बाबीखाली माहे एप्रिल २०१८ ते माहे डिसेंबर २०१८ पर्यंत रु.७,५०,०००/ इतक्या वाढीव रकमेचा कॅशफ्लो सादर केलेला आहे. त्यानुसार आता सन २०१८-२०१९ या आर्थिक वर्षात लेखाशीर्ष-ए-४, २०७० इतर प्रशासकीय सेवा ००-००३ प्रशिक्षण (००)(११) वनामती, नागपूर (२०७००८६२) खाली माहे ऑगस्ट २०१८ ते डिसेंबर २०१८ या कालावधीकरीता ३६-सहायक अनुदाने (वेतन) या बाबीखाली वाढीव रु.७,५०,०००/- (रूपये सात लक्ष पन्नास हजार फक्त) इतके अनुदान पुढील मासिक कॅश फ्लो प्रमाणे पुढील अटी व शर्तीच्या अधीन राहून वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

(रुपये हजारात)

| लेखाशीर्ष (२०७००८६२) | माहे एप्रिल २०१८ | माहे मे २०१८ | माहे जून २०१८ | माहे जुलै २०१८ | माहे ऑगस्ट २०१८ | माहे सप्टेंबर २०१८ | माहे ऑक्टोबर २०१८ | माहे नोव्हेंबर २०१८ | माहे डिसेंबर २०१८ | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ३६- सहायक अनुदाने (वेतन) -- शा.नि. दिनांक ०४.०५. २०१८ अन्वये वितरीत करण्यात आलेले अनुदान | ४५ | ४५ | ४५ | ५० | ५० | ५० | ५० | ५० | ५० | ४,३५ |
| ३६- सहायक अनुदाने (वेतन)-- वितरित करण्यात येणारे वाढीव अनुदान | ---- | --- | ---- | --- | १,५० | १,५० | १,५० | १,५० | १,५० | ७,५० |
| एकूण | ४५ | ४५ | ४५ | ५० | २,०० | २,०० | २,०० | २,०० | २,०० | ११,८५ |

अ) संचालक वनामती, नागपूर या संस्थेने माहे ऑगस्ट, २०१८ व डिसेंबर २०१८ या महिन्यांचा खर्च वितरीत अनुदानाच्या मर्यादेत ठेवावा व प्रत्यक्ष झालेल्या खर्चाइतकी देयके कोषागारात सादर करुन रक्कम कोषागारातून आहरीत करण्याची दक्षता घ्यावी.

आ) वनामती, नागपूर यांनी वित्त विभागाचे दिनांक ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील मुद्दा ८ (१०) नुसार "निधी स्वीय प्रपंची लेखा अथवा बँक खात्यात जमा न करता खर्च केला जाणार आहे" या अटीचे पालन होईल या अटीच्या अधीन राहून सदर निधीचे वितरण करण्यात येत आहे.

इ) सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात केलेल्या खर्चाचा खर्च ताळमेळ करण्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित नियंत्रक अधिकारी तसेच आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील.

ई) वनामती, नागपूर या संस्थेने वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE ), महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र १/२ , मुंबई/नागपूर व शासनाला सादर करावे.

४. वसंतराव नाईक राज्य कृषि विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, नागपूर या संस्थेने उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके ठेवण्यात यावे व सदर लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र १/२ , मुंबई/नागपूर यांना राहतील.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या उपरोक्त वाचा अनुक्रमांक २ येथे नमूद दिनांक ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०९१०१५१४०६२२०७ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने सांक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vilas Ramdas Thakur

Digitally signed by Vilas Ramdas Thakur
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=CMTD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cb156fb408217396128e8dcaeed3f6fa70d9fd209eb9efc83bdd68b308614534, cn=Vilas Ramdas Thakur
Date: 2018.09.10 15:23:46 +05'30'

( वि.रा.ठाकूर )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१,मुंबई,
२. महालेखापाल,(लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२,नागपूर,
३. अपर मुख्य सचिव(सेवा) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांचे वरीष्ठ स्वीय सहायक,
४. संचालक, वनामती, नागपूर,
५. वरिष्ठ प्रशासनिक व लेखाधिकारी, वनामती, नागपूर (२ जादा प्रतींसह),
६. सह संचालक, लेखा व कोषागारे, (संगणक शाखा), मुंबई,
७. वरिष्ठ कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, नागपूर
८. उप कोषागार कार्यालय, नागपूर
९. वित्त विभाग (व्यय-४/ अर्थसंकल्प १४), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन क्रमांक २५, मंत्रालय मुंबई-३२.
११. निवड नस्ती.